# मांडणी

# चौथ्या नवतेचा शोध

'गझला', 'अफवा', 'युरेका'? ह्यानंतरचा माझा 'महानुभव' हा चौथा काव्यसंग्रह. पहिला 'गझला' किंवा तिसरा 'युरेका' अद्याप प्रकाशित झालेले नाहीत. दुसरा पॉप्युलरच्या रामदास भटकळांनी अगत्याने काढला. त्यानंतरचा चौथा हा 'महानुभव'. संग्रहाचे नाव 'महानुभव' असले तरी ह्यातला अनुभव फार मोठा आहे असे नाही. पण एकंदरच पसाऱ्यावरून हेच नाव द्यावेसे वाटले. काहीसा परंपरा शोधण्याचा हा प्रयत्न असेल; कारण पूर्वीपेक्षा आज ह्या परंपरेची मुळे शोधण्याची तीव्र गरज भासते आहे. किंबहुना मी ज्या पिढीत जन्मलो त्या पिढीला तर ती शोधण्याशिवाय पर्याय नाही.

सर्वसाधारण मराठी कवितेत माझी कविता नेमकी कुठे आहे हे जेव्हा मी शोधतो तेव्हा अस्वस्थतेखेरीज काहीही पदरात पडत नाही. एका अर्थाने आमची पिढी करंटी आहे. आधीच्या पिढ्यांना जसा एक नवा आशय ठोसपणे मिळाला तसा आम्हाला मिळालेला नाही. आमचे बालपण इंदिरा गांधींच्या भोंगळ राजवटीच्या अंगाखांद्यावर गेले आहे. सांस्कृतिक उन्मेषांचा पद्धतशीरपणे घडवल्यासारखा ऱ्हास आम्ही आमच्या शालेय व महाविद्यालयीन जीवनात पाहिला आहे. खेळायला फुटबॉल किंवा क्रिकेटची कीट मिळावी म्हणून आमच्या पिढीने अत्यंत उथळपणे काही मूर्ख उमेदवारांचा प्रचार केला आहे. कॉलेज जीवनात निवडणुका जिंकण्यासाठी आम्ही उमेदवार पळवण्यापासून ते स्त्रीमतदारांना बलात्काराच्या धमक्या देण्यापर्यंत मजल गाठली. टीव्हीने आमचे सांस्कृतिक जीवन घडवल्यामुळे संस्कृतीचा भाषिक अभ्यास आमच्यापासून दुरावला आणि अत्यंत उथळ करमणुकीच्या गुलालात आम्ही सांस्कृतिक अस्मितेचं कुंकू पुसून तिला विधवा केली. मुलीचा फ्लॅट किंवा नोकरी हा आमच्या प्रेमाचा प्रमुख निकष आहे. एकीकडे ब्ल्यू फिल्ममुळे संभोगाबाबत नष्ट झालेली लज्जेची भावना तर दुसरीकडे 'जात' बघून प्रेम करणाऱ्या पोरीबाळी यांच्या विचित्र कैचीत आम्ही जगतो आहोत. एकीकडे टीव्हीमुळे संपूर्ण विश्व आमच्या अंगणात तर दुसरीकडे आमच्याच घरातल्या राम, मौलाना आझाद, म. फुले यांच्याबद्दल आम्हाला जे वाटते ते दृष्य-माध्यमात मांडायला परवानगी नाही. टीव्ही, चित्रपट जाऊ द्या, पण साध्या नाटकाचा जरी वापर करायचा म्हटला तर सेन्सॉरचे व्यक्तीस्वातंत्र्याचा पुरता खिमा करणारे नियम आमच्या बोडक्यावर बसलेच आहेत. पूर्वी संस्कृतीच बधिर वाटायची. आताशा आमची सृजनशील जाणीवच बधिर झाल्यासारखी वाटते. आमचं सध्याचं सांस्कृतिक वय पाच आहे

आणि अशा सांस्कृतिक अनाथाश्रमात मला आणि आमच्या पिढीला स्वत:ची नवी कविता शोधायची आहे, तिची नवी स्वायत्त भाषा घडवायची आहे.

आमच्या पिढीत चटकन् जाणवणारी पहिली गोष्ट कोणती असेल तर ती म्हणजे कवितेचे सांस्कृतिक जीवनातले स्थान जवळ जवळ संपुष्टात आले आहे. लोक आजकाल टीव्हीमुळे काही वाचतच नाहीत आणि त्यांनी काही वाचायचा प्रयत्न केला तर ह्या प्रयत्नांची मजल कथा-कादंबरीपलीकडे जात नाही. त्यामुळे देवाचे लाडके म्हणवून घेणाऱ्या कवीच्या इगोचा आज पार भुगा झालेला दिसतो. एकीकडे वैश्विक दर्जा असलेली उत्तममोत्तम कविता दिलीप चित्रे, अरुण कोल्टकर, वसंत डहाके, नामदेव ढसाळ प्रभृतींच्याकडून निर्माण होत असताना दुसरीकडे ह्या नावाचे कोणी लेखक मराठीत आहेत आणि ते कविता करतात ह्याची सामान्य रसिकांना साधी कल्पनासुद्धा नाही. नेमाडेंनी आदिलेखक नष्ट झाल्याबद्दल खंत व्यक्त केली होती. आम्हाला तर आदिकवी जाऊ द्या कवीदेखील नष्ट होत चाललाय त्याबद्दल जाणीव नाही आणि जाणीव झाली तरी त्याबद्दल खंत नाही. ह्यामागचे मुख्य कारण अर्थातच शिक्षण आहे. आपल्या शिक्षण-पद्धतीत कविता हीदेखील चित्रकला किंवा शिल्पकलेसारखी कला असून तिच्यासाठी साधना करावी लागते आणि ही साधना निर्मिक आणि आस्वादक दोघांनाही करावी लागते याची साधी जाणसुद्धा नाही. आपल्या वाङ्मय शिकवणाऱ्या बऱ्याच प्राध्यापकांची लायकी शंकास्पद आहे, ह्यातील अनेकांना १९६० नंतर मराठी वाङ्मयात काय स्थित्यंतरे झाली त्याची माहिती नाही. मराठीचा नवा अभ्यासक्रम जाहीर झाला की त्या त्या पेपरचे गाईड खरेदी करण्यासाठी विद्यार्थ्यांच्यापेक्षा स्वत:चा क्लेम आधी लावणारे प्राध्यापक माझ्या परिचयाचे आहेत. ह्यातल्या काही दुढ्ढाचार्यांना नवीन कवितेविषयी काडीचीही आस्था नाही. मध्यंतरी एका विद्यापीठात नामदेव ढसाळांचा 'गोलपिठा' अभ्यासक्रमात समाविष्ट होणार म्हणताच ह्या दुढ्ढाचार्यांपैकी एकाने शिवाम्बू पिऊन एक समविचारी प्राध्यापकांची चळवळवजा गर्दी जमवून तो काव्यसंग्रह रद्द करवला होता. असे हे प्राध्यापक आम्हाला आधुनिक कविता शिकविणार तरी काय? जे मुळात त्यांनाच समजलेलं नाही ते आम्हाला उलगडून दाखवणार तरी काय? (अर्थात सर्वच प्राध्यापक असे नाहीत) बरं, ही कविता निदान टेक्स्टबुकातून आमच्यापर्यंत पोहचण्याचे काही चान्सेस? त्या बाबतीतही एक सार्वजनिक अराजक! केकावली, आख्यानकविता, हरपले श्रेय, सुधारकातले तुकडे वाचून कुणा नवीन पोराला काव्याविषयी आवड निर्माण होणे शक्य आहे का? (ज्ञानेश्वर आणि महानुभवी साहित्याच्या अभ्यासकांना एक नव्या पिढीची सूचना. विन्दांनी जसे अनुभवामृताचे अर्वाचिनीकरण केले तसे ज्ञानेश्वरीय आणि महानुभवीय साहित्याचे कुणीतरी

अर्वाचिनीकरण करा. शब्दांचे अर्थ लावत त्यांचा आस्वाद घेण्याचा संयम आमच्या पिढीजवळ नाहीये आणि तेवढा वेळही नाही. आम्हाला आधुनिक साहित्यातले हजारो जगभर पसरलेले मास्टरपीस वाचायचे आहेत) मध्यंतरी तर शासनाने लायकी नसलेल्या दलित कवींच्या कवितेची एकच भरताड पाठ्यपुस्तकात केली होती. त्यावरून माझ्या समकालीन मित्रांचा दलित कवितेविषयी भलताच गैरसमज झाला. हे लोक निबंध लिहिण्याऐवजी कविता का लिहितात ह्या प्रश्नाचे उतर मला शेवटपर्यंत देता आले नाही. शेवटी नामदेव ढसाळ आणि यशवंत मनोहर त्यांच्या हातात ठेवले आणि ते वाचल्यानंतर बिचाऱ्यांचे आत्मे संतुष्ट झाले. पूर्वी केशवसुतांसारखा एक अत्यंत सामान्य कवी महान म्हणून बोडक्यावर मारला जायचा. आता ती जागा काही दलित कवींनी घेतली आहे. थोडक्यात काय तर आम्हाला कविता कशी शिकवायची त्याची अक्कल नाही. ती शिकवणाऱ्यांची निवड कशी करायची त्याची अक्कल नाही आणि कोणत्या कविता निवडाव्यात त्याचीही अक्कल नाही. आपण एकविसाव्या शतकात चाललोय आणि मराठीचा अभ्यासक्रम त्याप्रमाणे बदलून घ्यायला हवा हे आपल्या अजूनही लक्षात येत नाही. माझे तर असे स्पष्ट मत आहे की, मराठीच्या पाठ्यक्रमात निम्म्या कविता किंवा गद्य हे त्या त्या वर्षाच्या जास्तीत जास्त २० वर्ष आधीच्या हव्यात, म्हणजे १९९० साली पाठ्यपुस्तक तयार करताना निम्म्या कविता १९७१ ते १९९० ह्यांच्या दरम्यानच्या हव्यात. गद्य साहित्य तर १० वर्षातलेच लावावे. तरच विद्यार्थ्यांना त्यांचे स्वत:चे जगणे आणि त्यांची होत असलेली भाषिक अभिव्यक्ती यांचा एकमेकाशी असलेला नेमका संबंध लक्षात येईल. या निवडीत सर्वच कविता सोप्या निवडणे परवडणारे नाही. हे करताना संत, पंत आणि पंथ बाजूला ठेवावे लागले तरी चालतील.

आमच्या पिढीपुढे दुसरा जो महत्त्वाचा प्रश्न उभा राहिला आहे तो खुद्द मराठी कवितेविषयी. आपल्या पिढीकडे मागील पिढ्यांपेक्षा नवीन असे काही सांगण्यासारखे आहे का, किंवा जे जुनेच आहे, ज्यात फारसे परिवर्तन झालेले नाही ते नवीन शैलीत मांडता येईल का? असा हा प्रश्न आहे. मराठीच्या काव्यपरंपरेत नेहमीच नवता आणि विस्तार अशा पद्धतीने संक्रमण झाले आहे. मराठीची पहिली नवता सुरू झाली, बाबा पद्मजी, फुले-केशवसुतांपासून आणि बालकवी, गोविंदाग्रज, बी, तांबे या कवींनी तिचा पाया घातला, तर माधव जुलियनांच्या पिढीने तिचा विस्तार केला. तिचे सर्वसंपन्नत्व कै. बोरकर, ना. ध. देशपांडे, मनमोहन, पु. शि. रेगे, ग्रेस, ना. धों. महानोर प्रभृतींनी प्रकट केले. मराठीची दुसरी नवता सुरू केली बा. सी. मर्ढेकरांनी. शरद्चंद्र मुक्तिबोध, विन्दा करंदीकर, विश्राम बेडेकर यांनी तिचा पाया घातला तर ती भाषिक सामर्थ्यासह सर्वसंपन्न झाली सदानंद रेगे, डहाके, प्रभा गणोरकर, विलास सारंग यांच्या कवितेत. यातल्या पहिल्या नवतेत

रोमॅण्टिक भूमिका अधिक बलवान होती तर दुसऱ्या नवतेत आधुनिकतेची भूमिका प्रबळ दिसते; मात्र ही आधुनिकता हीही वसाहतवादाला बळी पडलेली आधुनिकता होती हे लक्षात घेण्याजोगे आहे. जे केशवसुतांचे रोमॅण्टिक नवतेसंदर्भात झाले तेच मर्ढेकरांचे आधुनिक नवतेसंदर्भात झाले. दोघांनाही वसाहतवादाचे आक्रमण थोपवता आले नाही. निर्भरशील, प्रबोधनवादी, रोमॅण्टिक असा ठोस आशय पहिल्या नवतेकडे दिसतो तर दुसरी नवता युद्धोत्तर आधुनिक जाणिवांनी झाकोळलेली दिसते. तिसरी नवता सुरू झाली ती दिलीप चित्रे, अरुण कोल्टकर, नारायण सुर्वे, नामदेव ढसाळ, मनोहर ओक वगैरे प्रभृतींपासून. दुसऱ्या नवतेला श्री. पु. भागवत आणि राम पटवर्धन यांसारखे साक्षेपी संपादक मिळाले व त्यांनी जशी साहित्यात एक महत्त्वाची भूमिका बजावली नेमकी तशीच महत्त्वाची भूमिका या नवतेत अशोक शहाणे, राजा ढाले वगैरे प्रभृतींनी बजावली. ही नवता चंद्रकांत पाटील, यशवंत मनोहर, अनुराधा पाटील, भालचंद्र नेमाडे, तुळशी परब, सतीश काळसेकर, प्रकाश जाधव, मल्लिका अमरशेख यांच्यामुळे अधिकच संपन्न भासते. आधीच्या क्रांत्या ह्या काहीशा व्यक्तींनी घडवल्या होत्या. इथे मात्र कवींचा एक समूहच हे परिवर्तन घडवू आणू पाहताना दिसतो. संवेदनांचे सरळ भाषांकन करणे ही ह्या सर्वांची वृत्ती, तर परंपरेची मुळे सखोल शोधून तिची आधुनिकतेशी योग्य सांगड घालून कविता पुढे नेण्याची किंवा परंपरेच्या विरोधात उभे ठाकण्याची या सर्वांची धडपड ! ह्या लोकांनी खऱ्या अर्थाने मराठी कविता वैश्विक केली. पहिल्या नववेत अत्यंत दुय्यम दर्जाची कविता जास्त लिहिली गेली. अपवाद बोरकर, पु. शि. रेगे, महानोर, मनमोहन, ना. घ. देशपांडे यांच्या काही कवितांचा. दुसऱ्या नवतेत कविता गुणवत्तेच्या दृष्टीने खूपच सुधारली, पण परंपरा आणि नवता यांच्यातलं अद्वैत कुणालाच साधलेले दिसत नाही. विन्दा करंदीकर, सदानंद रेगे यांची वैश्विक गुणवत्ता तर केवळ त्यांच्या तंत्रशरणतेमुळे मारली गेली. मर्ढेकरांचा काहीसा अकालीच मृत्यू झाला. मात्र ह्या काळातली कविता गुणवत्तेच्या दृष्टीने वैश्विकतेच्या घराचे दरवाजे ठोठावताना दिसते. तिसरी नवता मात्र सरळ हे दार तोडून आत घुसली. तिची अंगभूत गुणवत्ताच अशी होती की, तिला थांबवणे कुणालाच शक्य नव्हते. परंपरेचे भान राखत आणि परंपरा व नवता यांच्यातील अद्वैत कुठेही न सोडता या पिढीने आपली कविता घडवली. प्रतिमांच्या जंजाळातून, कल्पनाजन्य चमत्कृतीतून कवितेला मुक्त करून तिला आशयसन्मुख केले. एकीकडे स्वत:च्या परंपरेत स्वत:ची मुळे शोधत, तर दुसरीकडे इतर भाषिक संस्कृती आपल्या परिघात समाविष्ट करून या सर्वांनीच ही कविता एकीकडे सखोल तर दुसरीकडे मोठा कॅनव्हास व्यापणारी बनवली. आशयाला अलंकृत करण्याचे टाळून त्यांनी कविता एकीकडे नैसर्गिक केली तर दुसरीकडे केशवसुती सरधोपटपणा

टाळून मोजक्या पण अर्थवाही प्रतिमांच्या समावेशानी ती निबंध होणार नाही याची काळजी घेतली. व्यंगार्थाचा अतिरेक टाळला आणि वाच्यार्थाचा कवितेतील दुरुपयोग नष्ट केला. आजही गुरुनाथ सामंत, विवेक राजापुरे, नारायण कुलकर्णी, कवठेकर, दिलीप धोंडो कुलकर्णी, अनुराधा पाटील, उत्तम कोळगावकर, र. कृ. जोशी इत्यादी कवी ही नवता संपन्न करताना दिसतात.

नेहरूंच्या मृत्यूनंतर जन्मलेल्या आमच्या पिढीला मात्र कवितेबाबतीत कोणतीही स्पष्ट भूमिका घेता आलेली नाही. ह्या तिन्ही नवतांशी आपले नाते नेमके काय, त्यांच्याशी आपला संबंध कसा जोडता येईल याविषयी कसलेही स्पष्ट आकलन आमच्या पिढीत दिसत नाही. हा आकलनातील धूसरपणा आणि त्यामुळे उडालेला गोंधळ आज कुठल्याही वाङ्मयीन नियतकालिकाची कवितेसाठी राखून ठेवलेली पाने चाळली तरी स्पष्ट दिसतो. नवीन सांगण्यासारखे काही नाही आणि जे जुने आहे ते नव्या पद्धतीने मांडता येत नाही अशी ही विलक्षण गोची आमच्या पिढीची दिसते. ह्यातल्या अनेकांनी आपले नाते पहिल्या नवतेशी जोडलेले दिसते. पण गंमत अशी आहे की, पहिल्या नवतेचा रोमॅण्टिसिझम देखील आमच्या पिढीतल्या लोकांना नीट समजलेला दिसत नाही. ह्यातील अनेक कवी ग्रेस, पु. शि. रेगे यांचे उथळ अनुकरण करताना दिसतात. अनेकांना तर ग्रेससारखी दुर्बोधता आपल्या कवितेत असणे भाग्याचे वाटते. वास्तविक जो गूढपणा ग्रेसमध्ये आढळतो तो त्याच्या रोमॅण्टिक व्यक्तिमत्त्वाची अपरिहार्य परिणिती आहे. अशा प्रकारचं व्यक्तिमत्त्व आपल्यात नसतानादेखील अनेक कवींनी अशा तथाकथित दुर्बोध कविता लिहिलेल्या दिसतात. अनेकांचे आकलन तर वरवरचे आहे. पहिल्या नवतेची भूमिका वसाहतवादी रोमॅण्टिक असली तरी पु. शि. रेगे, मनमोहन, ना. धों. महानोर यांची कविता नंतर ठोस रोमॅण्टिक देशी आशय मांडताना दिसते हे अनेकांच्या लक्षात आलेले दिसत नाही. ठोस आशयाच्या अभावी अनेकांनी सुरेश भटांनी निर्माण केलेला गझलेचा सोपा रोमॅण्टिक आकृतिबंध गिरवायला सुरुवात केलेली दिसते. त्यात खावर, सौमित्र, म. भा. चव्हाण, चंद्रशेखर सानेकर यांचा अपवाद वगळता इतरांच्या गझला ह्या आशयाच्या ठराविक गिरमिटात फिरताना दिसतात. ह्याला कारण भटांनी बोकाळून ठेवलेला गझलियतचा आग्रह आहे. भटांच्या 'गझलियत' संकल्पनेत ज्या बसतील त्या गझला व बाकीच्या फसलेल्या कविता असा एक अपप्रचार जाणीवपूर्वक पंथवादी भूमिकेतून केला गेलेला दिसतो. त्यामुळे अनेकांना उर्दूत रूढ होऊ पहात असलेल्या मुक्त गझलेविषयी काडीचीही माहिती नाही. त्यामुळे एखाद्याने मुक्त गझला लिहिल्या की त्यावर तुटून पडायला ही माणसे तयार दिसतात. त्यातच गझलेत आधुनिक जीवनाची, त्यातून व्यक्त होणाऱ्या आशयाची व्यामिश्रता व्यक्त होणे आवश्यक आहे. एका शेरात ही गुंतागुंत पकडताच

येत नाही, पण गझलेची मर्यादा सुरेश भटांनाच नीट कळालेली दिसत नाही तिथं त्यांच्या शिष्यवरांना ती कळेल असं आज तरी वाटत नाही. भटांनी आमच्या पिढीचे जेवढे नुकसान केले तेवढे कुणीच केले नसेल. त्यांच्या गझलेविषयी पूर्ण आदर ठेवून हे विधान करावेसे वाटते. थोडक्यात, आमच्या पिढीतले कवी हे ग्रेस आणि सुरेश भट ह्या कवींमध्ये भटकताना दिसतात. रोमॅण्टिक नवतेशी नातं सांगू पाहणाऱ्यांपैकी एकाही कवीला अद्याप स्वत:ची स्वायत्त ओळख सापडलेली दिसत नाही. आमच्या पिढीच्या आधीच्या वासंती मुजुमदार, अरुणा ढेरे, अरुण म्हात्रे आदींच्या कवितेत ह्याबाबत केवळ एक आश्वासन दिसते, पण त्याची पूर्ती दिसत नाही. नव-रोमॅण्टिकवाद्यांची ही शोकांतिका होत असतानाच आधुनिक कवीही एका आवर्तात सापडलेले दिसतात. आमच्या पिढीला नवा क्रांतिकारक आशयच उपलब्ध नसल्याने क्रांतिकारक आशयाची नवीन कविता लिहिण्याचे कर्तृत्व तिच्या ठायी जमा होणे अवघडच दिसते. त्यामुळे नवीन चौथी नवता उभी करावी असे वाटणारे कवीही असहाय्य झालेले दिसतात. 'दशकांच्या कविता'मधील पिढी साध्या-सोप्या भाषेत कविता लिहून गेली. स्वतंत्र भारतात जन्मलेल्या ह्या पहिल्या पिढीला कवितेच्या क्षेत्रात फारसे कर्तृत्व गाजवता आले नाही. दुसऱ्या पिढीचीही वटचाल आता त्याच दिशेने होणार की काय अशी शंका वाटत आहे. दलित कवितेने क्रांतीसंबंधी जी रोमॅण्टिक दृष्टी निर्माण केली तिच्याबाबत आमच्या पिढीचा पूर्ण भ्रमनिरास झाला आहे. दलित कवींची कधीकाळी वास्तव वाटणारी क्रांतिकारक कविता आमच्या पिढीला चक्क भाबडी वाटते. त्यामुळे ह्या कवितेशी नाते जोडणे आम्हाला शक्य होत नाही. त्यातच गोर्बाचेव्हनी केलेल्या क्रांतीमुळे मार्क्सवाद हे एक कालबाह्य ठरलेले तत्त्वज्ञान असल्याचे सिद्ध झाले आहे. त्यामुळे तथाकथित मार्क्सवादी दृष्टिकोन आणि नारायण सुर्वे, नामदेव ढसाळ यांची कविता आम्हाला भावत नाही. त्यांच्या कविता म्हणजे केवळ पोकळ वल्गना वाटतात. ज्या गजानन माधव मुक्तिबोधांचा वास्ता लघुनियतकालिकांचे अर्ध्वयू चंद्रकांत पाटील देत असतात त्यांची मीमांसा व कविता आता पटत नाही. हिंदीतील ही सर्वच डावी परंपरा आता भावत नाही. त्यामुळे ह्या कवितेशीही नाते जोडणे आता अवघड वाटते. ह्या तथाकथित परिवर्तनवादी चळवळींशी निगडित असलेले आशयद्रव्य आता दुरावले आहे. त्यापेक्षा दिलीप चित्रे (मला व्यक्तिश: विसाव्या शतकातला सर्वश्रेष्ठ मराठी कवी दिलीप चित्रेच वाटतो) अरुण कोल्टकर यांचीच त्यांच्या अस्तित्वानुभवाशी नाते सांगत व परंपरेचे भान राखत आलेली कविताच आम्हाला अधिक भावते; पण ही कविता मुळातच अनुकरणाला अतिशय कठीण असल्याने सर्वसाधारण कवी तिच्या वाटेलाही जाताना दिसत नाही. त्यातच ह्या पिढीची समीक्षादृष्टी, मग ती नेमाडेंची असो किंवा दिलीप चित्रेंची

असो, संपूर्ण स्वीकारणे अवघड जाते. विशेषत: ह्या लोकांचा परंपरेचा अति गौरव बुचकळ्यात टाकणारा आहे. संतकवींशी नाते जोडण्याची सक्ती आम्हाला पटत नाही. नेमाडेंची वास्तववादी भूमिका तर सरळ सरळ कालबाह्य वाटते. कादंबरीतील वास्तवसन्मुख भूमिका कवितेला स्वभावेच पेलता येत नाही. मुळातच टीव्हीसारखे प्रचंड ताकदीचे माध्यम असताना साहित्याने परंपरेचे आणि जीवनाचे वस्तुनिष्ठ चित्रण करावे हा हव्यास मुर्खपणाचा वाटतो. कारण अशा वस्तुनिष्ठ चित्रणासाठी कॅमेरा नावाचे सशक्त माध्यम जन्मलेले आहे. तेव्हा ही वास्तववादी भूमिका परवडणारी नाही. ज्यांना वस्तुनिष्ठ अनुभव हवा आहे त्यांनी असा चित्रपट किंवा टीव्ही-सिरीयल काढाव्यात हे उत्तम ! साहित्यात हा वास्तववाद कालबाह्य वाटतो. किंबहुना दृश्यमाध्यमाच्या वाढत्या प्रभावामुळे साहित्याचे प्रयोजनच बदलले आहे असे माझे स्पष्ट मत आहे. जो अनुभव दृश्य माध्यम देऊ शकत नाही तो अनुभव भाषेने द्यायला हवा असे मला वाटते आणि त्या दृष्टीने एकविसाव्या शतकात कविता हा सर्वश्रेष्ठ वाङ्मय प्रकार म्हणून पुन्हा उदयास येईल ह्याविषयी माझ्या मनात शंका नाही. थोडक्यात काय तर तिसऱ्या नवतेची समीक्षादृष्टी शंकास्पद वाटते. त्यातच गजानन मुक्तिबोध, सर्वेश्वरदयाल सक्सेना आदी डाव्या विचारांच्या कवींच्या श्रेष्ठ कविता वाचून आणि त्यांच्या तुलनेत नारायण सुर्वेची कुवत दिसत असूनही त्यांचा सर्वश्रेष्ठ कवी म्हणून ह्यांनी केलेला गौरव, नामदेव ढसाळांच्या कवितेतल्या अनुभवातली वाढती यांत्रिकता, चंद्रकांत पाटलांची वर्तमानपत्री कवितेकडे सुरू झालेली वाटचाल (इंत्यंभूत), दलित कवितेचा आशय आणि अभिव्यक्ती ह्या दोन्ही संदर्भातला साचेबंदपणा, संत कवी व परंपरा ह्यांच्यांबाबत वाजवीपेक्षा जरा अधिकच निघणारा गहिवर, कादंबरीला बखर करण्याचा चाललेला प्रयत्न (आणि त्या नादात 'कोसला' ही जगातील एक श्रेष्ठ कादंबरी लिहून ५० वर्षे कादंबरी पुढे नेल्यानंतर बिढार, जरीला, झूल सारख्या वास्तववादी कादंबऱ्या लिहून तिला पुन्हा ३० वर्षे मागे खेचणे (त्याही उत्तमच आहेत), ग्रेसच्या कवितेतील 'वासनेचे मायानुभव व न झेपणारी संन्यस्तवृत्ती' यांच्यात चाललेली रस्सीखेच लक्षात न घेताच जणु काही रोमॅण्टिक असणे हा गुन्हाच आहे असे मानून त्याच्यावर चढवलेले हल्ले (वास्तविक पु. शिं. नंतर ग्रेस हाच रोमॅण्टिक कवी. नाहीतर मराठीतील बहुतेक रोमॅण्टिसिझम हा उसना आणि उथळच आहे) खानोलकरांच्या कोकणी (किंवा देशीयतेच्या भाषेत देशी) अद्‌भुताकडें दुर्लक्ष करून नीतीची ढाल पुढे करून त्यांना झोडपणे व भाऊ पाध्येंच्या ढिसाळ कादंबऱ्यांचे कौतुक करणे, जी. ए. वगैरेच्या कथा, नाटक वगैरे बाबतीत ह्या लोकांनी पाळलेले सोयीस्कर मौन, हिंदीतील केदारनाथ, मुक्तिबोध वगळून श्रीकांत वर्माच्या सामान्य काव्यसंग्रहाची अनुवादासाठी केलेली निवड ह्या सर्व गोष्टींवरून ह्या लोकांचे ऐतिहासिक कार्य

आता संपले असे म्हणायला हरकत नाही. दलित कवींना हल्ली कवितेतही बी. सी. सवलत मिळतेय की काय असे वाटावे, अशा पद्धतीने हल्ली त्यांचे कौतुक होताना दिसते. त्यामुळे ही कविताही आता संपली आहे. तिने आत्मपरीक्षण केले तर ठीक आहे. नाहीतर आशयाऐवजी विचार जास्त व्यक्त करणारी ही कविता मृत्यू पावेल ह्याविषयी शंका नाही. एकीकडे आधुनिक वादाचा अस्त झालेला दिसत असतानाच देशीवाद्यांचांही मृत्यू होताना आमच्या पिढीने पाहिलेला आहे. त्यामुळे आमची गोची अधिकच गुंतागुंतीची आहे. आशयद्रव्याचा हा साचेबंदपणा आणि अभिव्यक्तीच्या चोखाळून झालेल्या पायबंद वाटा ह्यामुळे आम्ही एका विचित्र आवर्तात सापडलो आहोत. एकीकडे ग्रेसच्या प्रतिमावादी ओढाळ शब्दकाहुरांचे वाटणारे आकर्षण, दुसरीकडे दलित कवितेची सांकेतिक धुम्मस तर तिसरीकडे लघुनियतकालिकांनी वापरून वापरून शिळा केलेला आशय ह्यांच्यात हिंदकळणाऱ्या धेडगुजरी वाङ्मयीन संस्कृतीत आमची वाढ झाली आहे. त्यामुळे अलीकडील काही कवी धड रोमॅण्टिक नाही. धड आधुनिक नाही, धड आत्ममग्नही नाही, धड वस्तुनिष्ठही नाही अशी एक मिश्र कविता निर्माण करताना दिसतात. मराठी वाङ्मयीन संस्कृतीचा धेडगुजरीपणा हा एक त्यामुळेच चिंतेचा विषय झाला आहे.

माझी स्वत:ची वाङ्मयीन वाढ ही ह्या धेडगुजरी संस्कृतीत झाली असल्याने माझा प्रवास हा बऱ्याच वाक्वळणांनी युक्त झाला आहे. कवीचे पाय पाळण्यात दिसतात हे म्हणणे जर खरे मानले तर कोणत्याही अर्थाने मी जन्मजात कवी नाही असे मानावे लागेल. १९८२ सालापर्यंत माझा कवितेशी संबंध आला तो केवळ परीक्षेपुरताच. परीक्षेसाठीदेखील त्यावेळी फार बारकाईने साहित्य वाचणे झाले नाही. तत्त्वज्ञान, अध्यात्म, मानसशास्त्र, अर्थशास्त्र, इतिहास वगैरे विषयच जास्त आवडीचे असल्याने साहित्याकडे माझे तसे दुर्लक्ष झाले. ह्या काळात एखादा मार्क्सवादी मुलगा आला की, त्याला हिंदुत्ववादी बनवणे, हिंदुत्ववाद्याला मार्क्सचे महत्त्व पटवणे, कट्टर माणसाला आंबेडकरांची थोरवी सांगणे आणि दलित माणसाला भारताचा प्राचीन वारसा किती थोर होता आणि त्या वारशावर आता त्याचाही हक्क आहे हे पटवणे हा एक माझा आवडता उद्योग होता. विचाराने मी हिंदुत्ववादी होतो असे म्हणावयास हरकत नाही. पण हिंदुत्ववाद्यांचा सोवळेपणा आणि नार्सिसिस वृत्ती अमान्य असल्याने त्यांच्याशी माझे पटत नसे; मात्र

*हिंदू म्हणून जगलो, हिंदू म्हणून मरेन*
*तुम्ही काय पुरता मी तुम्हास पुरून उरेन*

ही वृत्ती आत कुठेतरी होतीच. वैश्य समाजात वाढलेला कुठलाही मुलगा कार्ल मार्क्सचा कट्टर विरोधक असतो तसा मीही होतो. मात्र मार्क्सला आंधळा विरोध करू नये असे माझे स्पष्ट मत

होते आणि आजही आहे. वैचारिक इतिहासात त्याचे एक स्थान आहे आणि त्याचे ते स्थान हिंदुत्ववाद्यांनी ओळखलेच पाहिजे असे माझे मत होते. ह्या साऱ्यांतून माझे स्वत:चे एक तत्त्वज्ञान तयार झाले होते. माझ्या सुरुवातीच्या कविता, ज्यांचा संग्रह आता पॉप्युलर प्रकाशन 'अफवा' ह्या नावाने काढत आहे त्यात माझ्या ह्या जडणघडणीचे जोरदार प्रतिबिंब दिसते. माझी पहिली कविता मी लिहिली ती अपघातानेच! १९८२ साली वैश्य समाजाची दरवर्षाप्रमाणे काव्यवाचन स्पर्धा होती. कोल्हापूरच्या वैश्य समाजात कवी एकंदरच कमी असल्याने वैश्य समाजवाल्यांना आपल्या मुलांनीही काव्यवाचन स्पर्धात भाग घ्यावा असे वाटायचे. त्यामुळेच माझ्या वडिलांनी मला ह्या स्पर्धेत भाग घेण्याची आज्ञा दिली आणि अस्मादिकांनी ती फारशी कचकच न करता पाळायचे ठरवले आणि मी कविता लिहायला बसलो. कवी रोमॅण्टिक असतात अशी एक भाबडी समजूत असल्याने आपल्या कवितेत गुलाब येईल अशा बेताने आम्ही कविता लिहिली. मराठीतल्या थोर काव्यपरंपरेशी फारसा परिचय नसल्याने ह्या कवितेत काव्य कमीच होते आणि निबंध जास्त होता. ही कविता आम्ही वाचली आणि आलेल्या कवींना रजनीशांचा संभोगातून समाधीकडे हा सिद्धांत पटवून देऊन आम्ही निवांत परतलो. त्यावेळी आम्हाला आपण कोणत्या धोकादायक क्षेत्रात पाऊल टाकले आहे याची कल्पनाही नव्हती. कुठल्याही गोष्टीचे मूळ शोधत जाण्याच्या आमच्या वृत्तीमुळे अस्मादिक केशवसुत, टिळक, बी., ज्यूलियन यांच्या काव्यसंग्रहांकडे वळले आणि पंधरा-एक दिवस आम्ही काव्य ह्या प्रकाराचा एकंदरच धसका घेतला. अतिशय थोर मानले गेलेले हे कवी इतके कंटाळवाणे आणि जांभईवाणे होते की काव्य हा काही आपला प्रांत नव्हे असेच आम्हाला वाटू लागले. सुदैवाने ह्याच वेळी गालिब हातात पडला आणि आम्ही बचावलो. अन्यथा आयुष्यभर कवितेकडे वळलो नसतो. त्यानंतर गालिब, साहिर, शकील असा प्रवास करत आम्ही ग्रेस-कोलटकर वगैरे प्रभृतींकडे वळलो. परिणामी सुरुवातीला मुक्त गझला भरपूर लिहिल्या. दोन संग्रह निघतील एवढ्या गझला झाल्या. मराठीतील प्रथितयश विनोदी लेखकांकडे आम्ही त्या, काव्यातील 'दर्दी' म्हणून पाठवून दिल्या; पण त्यांच्या सुदैवाने त्यांच्यापर्यंत त्या पोहचल्याच नसाव्यात किंवा "तुमच्या गझला वाचायचा प्रयत्न केला, पण वाचवल्या नाहीत" हे सांगणे जिवावर आल्यामुळे मला त्यांच्याकडून काहीच उत्तर आले नाही. ह्याच दरम्यान गूढानुभूती व्यक्त करणाऱ्या आणि सामाजिक बांधिलकी आम्ही त्या काळात फारच मानत असल्याने मराठीत ज्याला सामाजिक कविता म्हणतात तशा कविता आम्ही बऱ्याच लिहिल्या. कवितेचा झटका आला की २०-२५ कविता लिहूनच तो ओसरायचा. अशाच एका झटक्यात अस्मादिकांनी १००-१५० कविता तीन दिवसांत लिहिल्या आणि 'मरणावली' ह्या

नावाने त्या श्री. पु. भागवतांकडे पाठवून दिल्या. भागवतांनी त्या कविता परत पाठवून दिल्या, पण त्याचबरोबर या कवितांचे सुंदर विश्लेषण करून पाठवले. मात्र 'कविता लिहीत रहा' असे सांगितले. भागवतांनी कविता परत पाठवल्यामुळे अस्मादिक निराश झाले खरे पण प्रयत्न न सोडता आम्ही सामाजिक कविता 'पॉप्युलर प्रकाशन'च्या रामदास भटकाळांकडे पाठवल्या आणि त्या केव्हा परत येतात याची वाट पहात असतानाच त्यांचे त्या कविता स्वीकृत केल्याचे पत्र आले. त्यांना त्या कविता अतिशय आवडल्या होत्या. दोन प्रकारच्या कवितांना दोन वेगवेगळे प्रतिसाद बघून मी काहीसा चकितच झालो पण विचारांती भटकळांकडे पाठवलेल्या कविता ह्या अधिक चांगल्या आहेत ह्या निष्कर्षाला आलो. माझ्या जडणघडणीचे स्पष्ट प्रतिबिंब या संग्रहात होते. हिंदुत्ववाद्यांना प्रतिगामी समजण्याची फॅशन त्या काळी जास्तच असल्याने माझ्या कविता भटकळांनी स्वीकारल्या याचे आश्चर्य वाटले आणि कौतुकही वाटले. त्याचवेळी भागवतांनी परत केलेल्या कवितात आणखी काहींची भर टाकून त्या कविता मी पुण्यातील एका प्रकाशकाकडे पाठवल्या. त्या ताबडतोब परत आल्या. कारण ३०० कवितांचा संग्रह मराठी लोकांचा कवितेबाबतचा उत्साह लक्षात घेता काढणे त्यांना अशक्य वाटले. त्यामुळे त्याचे दोन भाग करून मी एक भाग पाठवला व एक ठेवून घेतला. तेव्हा त्याला प्रकाशकाने पुन्हा परत पाठवले व पैसे देत असाल तर छापतो असे सांगितले. त्यामुळे अस्मादिकांनी ते दोन्ही भाग तसेच ठेवून दिले. युरेका आणि महानुभव ह्या नावाचे हे दोन्ही संग्रह आणि गझलांचा एक संग्रह असे तीन संग्रह तसेच पडून राहिले आणि आजतागायत ते पडूनच आहेत.

आता जेव्हा मी या चार टप्प्यांकडे पाहतो तेव्हा वाटते की आपले काव्यलेखन अपघाती असले तरी त्याचा विकास मात्र अपघाती नाही. आमच्या तारुण्यात गझल नुकतीच मान्यता पावत होती. गुलाम अली, पंकज उधास, जगजितसिंग वगैरे मंडळी घरोघरी हिंडत होती. ह्याचा परिणाम म्हणूनच मी गझल लिहू लागलो. नंतर मात्र गझल पुरेशी सशक्त वाटत नसल्याने मी इतर फॉर्मकडे वळलो. क्रांतिकारी हिंदुत्ववादी भूमिका व्यक्त करायची असल्याने दलित कवितेशी चटकन् सूर जुळले. मात्र एकीकडे क्रांतीचे आकर्षण वाटत असतानाच दुसरीकडे ह्या क्रांतीकडे पाहण्याचा दृष्टिकोन काहीसा उपरोधिकही होता.

*एक पिढी आमची ही*
*इंद्रधनुष्यावर रांगणार आहे*
*साम्राज्याला तुमच्याही*
*वधस्तंभ भेटणार आहे.*

एकीकडे अशी गर्जना तर दुसरीकडे

*हृदय बंद करणाऱ्यांचे*
*कान उघडे असतात अफवा ऐकण्यासाठी*
*लक्षात ठेव*
*हे स्वत:स तत्त्वज्ञ समजतात.*

असा मार्क्सवादी क्रांतिकारकांचा व आंबेडकरवादी क्रांतिकारकांचा उपहास व क्रांतीची अफवा म्हणून संभावना असे दोन्ही दृष्टिकोन त्या कवितांत आढळतात. क्रांती झाली तर उत्तम, पण ती झाली तरी तिचा काहीच उपयोग होणार नाही, अशी निराश वृत्ती ह्या कवितांतून प्रकट झालेली दिसते.

सामाजिक बांधिलकी मानणाऱ्या कुठल्याही माणसापुढे अनेकदा, व्यक्ती की समाज, प्रेमिकेसोबतचे गुलजार आयुष्य की समाजसुधारणेची चळवळ असा प्रश्न येतो. स्त्रीपुरुषसंबंधात समाजव्यवस्था इतक्या विविध पातळ्यांवर आणि इतक्या सूक्ष्मपणे झिरपत असते की तिचा शोध घ्यायचा असेल तर तथाकथित क्रांतिकारक कवितांची पद्धत सोडून वेगळ्या पातळीवर त्या अनुभवाचा शोध घ्यावा लागेल असे मला वाटू लागले. ह्याच दरम्यान पाश्चिमात्य कवी व मराठीतील ग्रेससारखे प्रतिमाबंबाळ कवी ह्यांचे सामर्थ्य पटू लागले होते. त्यामुळे साहजिकच प्रतिमांच्या पातळीवर हा अनुभव पकडता येईल असे वाटल्याने मी तो तसा पकडायला सुरुवात केली. त्यातूनच 'युरेका'तल्या कविता जन्मल्या.

ह्याच कालखंडात, प्रत्येक हिंदुत्ववादी 'मोक्ष' ह्या पुरुषार्थाचा शोध घेतो, त्याप्रमाणे मीही घ्यायला सुरुवात केली होती. १९८० साली मी राजयोगाचा अभ्यास चालू केला होता आणि अपघाताने एकदा चिन्मय अवस्थाही प्राप्त झाली होती. इथे प्रत्यक्ष हेच प्रमाण असल्याने मतभेदाचा सवालच नव्हता. मात्र १९८१ साली मी पुन्हा पतनाकडे खेचला गेलो तो कायमचाच. मात्र ह्या काळातल्या गूढ अनुभूती शब्दात पकडणे मला आवश्यक वाटू लागले. त्या दृष्टीने प्रतिमावादी कविता हीच योग्य वाटल्याने मी हाही अनुभव प्रतिमांतून बांधून काढला आणि त्याला 'महानुभव' हे नाव दिले. ह्या पद्धतीत automatic writing वर जरा जादाच भर होता. त्याचा परिणाम त्या कवितांवर निश्चितपणे झाला.

ह्याचवेळी सर्वच राजकीय पक्षांत प्रामाणिक कार्यकर्त्यांची होणारी घुसमटही मी पाहत होतो. माझ्या कवितेच्या विकासात ह्या संदर्भातील कविता एक वेगळाच टप्पा घेऊन आल्या.

त्याचवेळी मी उत्तर भारतात गेलो आणि परतलो तेच मुळी पूर्णपणे व्यक्तिवादी बनून. सर्वच वैयक्तिक दु:खे ही समाजाची आणि समाजव्यवस्थेची निर्मिती असते ह्या बिंदूपासून सुरू झालेला माझा काव्यप्रवास आज, 'सर्वच दु:खाची निर्मिती व्यक्तींच करत असते' ह्या बिंदूपाशी आला आहे. १९८९ साली मी मुंबईत आलो आणि माझ्या व्यक्तिवादाने टोक गाठले. मुंबईत लिहिलेल्या ह्या कविता प्रतिमांच्या जंजाळापासून मुक्त होतच उगवल्या आणि त्यांच्या परीने वाढल्या. 'युरेका' किंवा 'महानुभव'मध्ये विशेषणांचे मला फार महत्त्व वाटायचे. ह्या काळात विशेषणे अक्षरश: नकोशी वाटायला लागली. ही कविता माझ्या व्यक्तिमत्त्वाला घट्ट चिकटलेली आहे. इतक्या आत्मनिष्ठ कविता मी कधीकाळी लिहीन असे मला वाटलेही नव्हते. पण प्रत्यक्षात तसे घडलेले दिसते.

ह्या कवितांचे मूल्य व स्थान समीक्षक ठरवतीलच. पहिल्या, दुसऱ्या आणि तिसऱ्या नवतेत त्यांचे धागेधोरे गुंतलेले दिसतात. ह्या बाबतीत माझ्या समकालीन कवींपेक्षा माझी काही वेगळी स्थिती नाही. आमच्यापैकी कोणी भविष्यात चौथी नवता उभी करेल की नाही मला माहीत नाही. सध्या फक्त स्वत:ला जे भावले ते व्यक्त करणे एवढेच कर्तव्य आहे.

माझ्या वैयक्तिक जीवनात कवितेचे स्थान अनन्यसाधारण आहे. मी कवितेसाठी जगत वगैरे नसलो तरी माझ्या जगण्यातून कविता निर्माण होत असते. मला वाटते प्रत्येक कविता ही कवीच्या भावनांचे, त्याचे स्वत:शी असलेल्या संबंधांचे आत्मचरित्र असते. स्वत:चे व्यक्तिमत्त्व उलगडून मांडणारा दुसरा कलाप्रकार मला तरी दिसत नाही. नाटक, चित्रपटातील अभिनयातील वस्तुनिष्ठतेपासून कविता अलिप्त राहू शकते. त्यामुळेच ती आत्मनिष्ठ संवेदनांचा हुंकार बनू शकते. चित्रपटाने, टीव्हीने कितीही विकास केला तरी चित्र, शिल्प, संगीत आणि काव्य ह्या कलांतील आत्मप्रत्ययाची ताकद ही माध्यमे कधीही देऊ शकणार नाहीत. त्यामुळेच कविता ही आधुनिक जीवनात केवळ स्वत:चा हुंकारच नसते तर टीव्हीमधून आक्रमण करणाऱ्या समूहाच्या संस्कृतीविरुद्ध केलेले ते बंड असते. स्वत:ची संवेदनशीलता शाबूत ठेवण्याचा तो एक आध्यात्मिक प्रयत्न असतो. म्हणूनच जोपर्यंत मानव आहे, त्याचे स्वत:शी नाते आहे तोपर्यंत तरी कवितेला मरण नाही, मग भले तिच्या जगण्याचे साक्षीदार फार थोडे लोक असोत. शेवटी जगणे किती जणांनी पाहिले, त्यापेक्षा जगणारा किती समृद्धीने जगला हेच महत्त्वाचे असते आणि कवितेला हाच न्याय लागू आहे.

